**कौटुंबिक न्यायालय, मुंबई येथील न्यायाधीश यांना कार्यालयीन कामकाजाकरीता १ नवीन शासकीय वाहन खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या ११२१/प्र.क्र.७७/का-नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक: ०८ मार्च, २०२२.

**वाचा:** १) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.कौटुंन्या१११५/प्र.क्र.१७८/का.९,दि.२०.१२.२०१६
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८.०७.२०२०
३) मा. उच्च न्यायालय,मुंबई यांचे पत्र क्र.A/Spl.Cell/Gen./४०१/२०२१, दि.११.०२.२०२१
४) कौटुंबिक न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. ४५९/२१, दि.०८.१०.२०२१

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील कौटुंबिक न्यायालयांचा वाहन आढावा मंजुर करण्यात आला आहे. सदर वाहन आढाव्यानुसार मुंबई येथील कौटुंबिक न्यायालयांकरीता एकूण तीन वाहने अनुज्ञेय आहेत. त्यातील एक वाहन एमएच-०२-एके-४६ हे निर्लेखित करण्यात आल्यामुळे, एक नवीन वाहन खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.३ व ४ अन्वये कौटुंबिक न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता.

कौटुंबिक न्यायालय, मुंबईकरीता कार प्रकारातील एमएच-०२-एके-४६ या निर्लेखित वाहनाऐवजी नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास वित्त विभाग व राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार कौटुंबिक न्यायालय, मुंबई येथील न्यायाधीश यांना कार्यालयीन कामकाजाकरीता १ नवीन शासकीय वाहन खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कौटुंबिक न्यायालय, मुंबई येथील न्यायाधीश यांना कार्यालयीन कामकाजाकरीता एमएच-०२-एके-४६ या निर्लेखित वाहनाऐवजी १ नवीन शासकीय वाहन खरेदी करण्यास रु.८.०० लक्ष किंमत मर्यादेत (वाहनाची किंमत वस्तू व सेवा कर+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहाय्यभूत साहित्य इत्यादी) खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे:-

(अ) संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या दि.२८.०७.२०२० च्या शासन निर्णयानुसार राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहन अनुज्ञेय केलेले इतर अधिकारी यांना रु.८.०० लक्षच्या मर्यादेत वाहनाची खरेदी करण्यात यावी. वाहन खरेदीसाठी मंजूर केलेल्या अनुदानामध्ये वाहनाच्या किंमतीसमवेत सर्व करांचा समावेश आहे.

(ब) अनुज्ञेय वाहन खरेदी करताना आपल्या कार्यक्षेत्रात सदर वाहनाची देखभाल व दुरुस्तीची सुविधा तसेच, वाहनाच्या सुट्या भागांची (Spare Parts) उपलब्धता समाधानकारक असल्याची खातरजमा करावी.

(क) नवीन वाहन ज्या अधिका-यास मंजूर करण्यात आले आहे, त्या अधिका-याकडूनच त्याचा वापर त्याच कार्यालयाकरीता, शासकीय कामकाजासाठीच करण्यात यावा, अन्य अधिका-यांकडे हस्तांतरीत करण्यात येऊ नये.

(ड) सदर अधिका-यांनी वाहन खरेदी केल्याचा अनुपालन अहवाल वाहन क्रमांकासहित शासनास सादर करावा.

(इ) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM Portal वरुन सदर वाहन खरेदी करण्यात यावे.

२. याकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांकेतांक २०१४ ०३४१, १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.६८/२०२२/व्यय-५, दि.२५.०१.२०२२ व अनौ.संदर्भ क्र.४३/२०२२/विनियम, दि.०४.०२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.go.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०९११५३५०८८१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HODAWADEKAR ANAND BHARAT

Digitally signed by HODAWADEKAR ANAND BHARAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0fccc37dcb4df84557086c3e03ca2237fcb16310ff5175370bf8e7719a02477e, pseudonym=B5831A1A752C2B9B028DAE403EFAAEE70CBC5944, serialNumber=22A102F28897F7CAE68B80F4942F265D6F71566570CEC799DFB3DB3B60C8864F, cn=HODAWADEKAR ANAND BHARAT
Date: 2022.03.09 11:54:26 +05'30'

**( आनंद भारत होडावडेकर )**
**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२) प्रबंधक (निरिक्षणे-१), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
३) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय , मुंबई,
४) महालेखापाल -१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,
६) वित्त विभाग-व्यय-५/विनियम,
७) विधी व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,
८) निवड नस्ती.